# बेरेनस्टेन अस्वल आणि दादागिरी

लेखक: स्टॅन आणि जॅन बेरेनस्टेन





# बेरेनस्टेन अस्वल आणि दादागिरी

मराठी अनुवादः

सुशील मेन्सन

एके दिवशी आई अस्वल, बाबा अस्वल आणि भाऊ अस्वल अंगणात काही कामात मग्न होते. तेव्हा बहीण अस्वल रडत रडत घरी आली. तिचा चेहरा ओरबाडल्यागत दिसत होता. तिचे कपडे फाटले होते. “तुला काय झालं?” आईने विचारले.

“कृपा करून सांग गं बाळा,” बाबा म्हणाले.

आपल्या बहिणीच्या अवस्थेवर भावाचा विश्वासच बसेना. तिच्या अंगातील झबले फाटले होते, चेहरा आणि केस वाईट स्थितीत होते, तिचा गुलाबी बो लटकत होता.

“पडलीस का कुठे?” आईने विचारले. बहिणीने मान हलवून नकाराचा संकेत दिला.

“अपघात झाला का?” बाबांनी विचारले. बहिणीने पुन्हा मान हलवून नकार दिला.



“मी अंदाज लावू शकतो काय झालं असावं,” भाऊ बोलला.
“मला वाटतं, कुणीतरी हिला मारलं असावं.”

“मारलं? क्रूरपणाच आहे हा!” बाबा म्हणाले.

“बहिणीसारख्या छोट्याशा, गोंडस पिल्लाला मारायला कुणाला बरं आवडेल?”

“असेल कुणीतरी दादागिरी करणारा,” भाऊ म्हणाला.

त्याचवेळी काही क्षण रडणे बंद करून बहीण म्हणाली, “भ....भ....भाऊ बरोबर बोलतोय.” ती हुंदके देऊ लागली. “एका वाईट, नीच, सैतान गुंडाने मला मारलं, विनाकारणच!” हा विचार मनात येताच तिला खूप राग आला आणि ती परत रडू लागली.





आईबाबांनी बहिणीला घराच्या पायऱ्या चढून वर यायला मदत केली. थोडे पाणी प्यायल्यावर ती शांत झाली. मग तिने तिच्यासोबत काय झाले ते सविस्तर सांगितले.

"*लिझ्झी, क्विनी* आणि मी मैदानात चेंडुशी खेळत होतो. तेव्हा तो *टफ्फी* नावाचा सैतान गुंड तिथे आला. त्याने पाय मध्ये घालून मला पाडलं. मी उठून विचारलं, 'आपण पाय कुठे ठेवतोय हे कळत नाही का तुला?' यावर मला काही कळण्याआधीच ढिश्यूम, ढीश्यूम, ढीश्यूम झालं आणि मी जमिनीवर पडले. तो बदमाष टफ्फी माझ्या छातीवर चढून बसला आणि माझ्या चेहऱ्याला माती फासू लागला."



"किती दुष्ट!" बाबा गरजले. "माझी हॅट कुठाय? मी लगेच मैदानात जातो आणि...." आईने बाबांना बाजुला खेचून एकीकडे नेले.

"तुम्ही असं काहीही करणार नाही," ती म्हणाली.

"पण काहीतरी करायला हवं," वडील म्हणाले.

"नक्की करू," आई म्हणाली. "पण याक्षणी आपल्याला बहिणीची काळजी घ्यायला हवी." मग तिने भावाला हाक मारली, "भाऊ! मला एक ओला कपडा....अरे, भाऊ कुठाय?"



"माहीत नाही," बहीण म्हणाली. "मिनिटभर आधी इथेच होता, लगेच कुठे गेला?"



लिझ्झी आणि क्विनी अजूनही मैदानातच खेळत होत्या. भाऊ तिथे पोहोचला. “टफ्फी नावाच्या गुंडाला खाऊ म्हणून मी ठोश्यांचं सँडविच आणलंय,” तो म्हणाला. “कुठाय तो?”

“भाऊ,” लिझ्झी म्हणाली. “मला वाटतं की तू....”

“गप्पा मारायची वेळ नाही ही,” तो गरजला. “बस, त्याच्याकडे बोट दाखवून सांगा मला आणि वाटेतून बाजुला व्हा!”

लिझ्झीने आपले खांदे उडवले आणि त्या छोट्याशा इंमारतीकडे बोट दाखवले. तिथे मुला-मुलींची शौचालये होती.

पण तिथे कुणीच सापडले नाही, कुणीच नाही. फक्त एक छोटीशी मुलगी मुलींच्या शौचालयातून बाहेर येताना दिसली.

पण हे काय! त्या छोट्याशा मुलीने जो टी-शर्ट घातला होता, त्यावर लिहिले होते, टफ्फी!

"तू टफ्फी आहेस?" भावाने विचारले.

"होय," ती मुलगी म्हणाली. "काही हरकत आहे तुझी?"

"पण तू तर मुलगी आहेस!" भाऊ म्हणाला.

"मग तुला काय वाटलं, वांगं?" टफ्फी म्हणाली.

भाऊ खूप आश्चर्यचकीत झाला. ज्या गुंडाला तो मैदानात मारून-मारून पळवणार होता, तो तर एक मुलगी होती आणि तीसुद्धा छोटीशी. त्याच्या बहिणीपेक्षाही ती लहानच दिसत होती.




जेव्हा लिझ्झी आणि क्विनी तिथे होणारा तमाशा बघायला आले, तेव्हा टफ्फी समजून चुकली की भाऊ कोण आहे. "अरे!" ती म्हणाली. "तू नक्कीच त्या मिस गुलाबी बो चा भाऊ असणार. ती माझ्याशी नीट वागली नाही, म्हणून मी तिला थोडीशी शिक्षा दिली. तूसुद्धा माझ्याशी हुज्जत घालणार आहेस का?"

खरंतर भाऊ त्यासाठीच आला होता. पण कोणत्याही परिस्थितीत त्याला एका मुलीला मारावेसे वाटत नव्हते. तसे केले तर तोसुद्धा गुंडच ठरला असता. तो गुपचुप वळला आणि तिथून निघून गेला.




"डरपोक! बहिणीसारखाच!" टफ्फी मोठ्याने ओरडत म्हणाली. हात खिशात घालून, जमिनीकडे पाहात भाऊ घराकडे निघाला.



काहीतरी करायला हवे होते! पण काय? भाऊ शाळेनजिक पोहोचला, तेव्हा त्याच्या मनात एक विचार आला. आता घाई करावी लागणार होती. ती शुक्रवारची दुपार होती आणि नंतर शाळा आठवडाभरासाठी बंद राहाणार होती. त्याला आशा होती की व्यायामशाळेचे प्रशिक्षक, श्रीयुत *ग्रिझमेयर*, अद्याप शाळेतच असतील.

भाऊ घरी पोहोचला तेव्हा त्याच्यासोबत एक मोठ्ठी पिशवी होती आणि त्यात एक वस्तू होती.





मुख्य दारातून आत जाण्याऐवजी तो गुपचुप मागल्या दाराकडे गेला. दाराची कडी उघडून त्याने पिशवी तळघरात टाकली. मग तळघराचे दार बंद करून तो मुख्य दारातून घरात शिरला आणि कुटुंबियांमध्ये जाऊन बसला.

"कुठे गेला होतास तू?" आईने विचारले. "आम्ही सगळे इथे मिटींग घेत होतो. ."

"अर्र....मी जरा मैदानात गेलो होतो," भाऊ म्हणाला.

"म्हणजे, तुला नक्कीच कळलं असेल की टफ्फी एक मुलगी आहे," आई म्हणाली. "आम्ही याच गोष्टीवर चर्चा करत होतो. आम्ही निर्णय घेतलाय की बहिणीने टफ्फीपासून दूर राहाण्यातच शहाणपण आहे. तुझं काय मत आहे?"



"ठीकच आहे," भाऊ म्हणाला. "पण मार तर बहिणीने खाल्लाय. तिला काय वाटतं?"

"हो, राहीन मी लांब टफ्फीपासून," बहीण म्हणाली. "पण मला तिच्या चेहऱ्यावर, नाकावर ठोसे मारायचेयत, तिच्या पोटऱ्यांना लाथ मारून तिला जमिनीवर पाडायचंय आणि...."

"अगं, बहिणी," आई म्हणाली. "या गोष्टीवर आपण आधीच चर्चा केलीय."

व्वा! भावाने विचार केला. बहिणीचे आणि माझे विचार सारखेच आहेत तर.





रात्रीच्या जेवणाआधी, भावाने बहिणीकडे एक कागद दिला. त्यावर लिहिले होते. “महत्त्वाचं आहे! सात वाजता तळघरात भेटू.”

बहीण भावासोबत गुप्त मिटींग करण्यासाठी तळघरात गेली. तिला एका स्टुलावर सुकवलेल्या शेंगा भरलेली आईची मोठी पिशवी दिसली. त्यावर एक कागद चिकटवला होता. कागदावर एक चेहरा काढला होता आणि त्यावर लिहिले होते, टफ्फी. भाऊ पिशवीजवळच उभा होता. त्याने शाळेतून आणलेली पिशवी हातात धरली होती. त्याच्या दुसऱ्या हातात पुस्तक होते.

“काय आहे हे सगळं?” बहिणीने विचारले.




"हे सगळं त्या गुंडगिरी करणाऱ्या टफ्फीसाठी आहे, तू परत तिच्याकडून मार खायचा नाहीस म्हणून," भाऊ म्हणाला.

"ऐकायला छान वाटतं," बहीण म्हणाली.

"शेंगांनी भरलेली ही आईची पिशवी आपली ठोशांची पिशवी आहे," भाऊ म्हणाला.

'ठोशांच्या पिशवीचं नाव टफ्फी आहे," बहीण म्हणाली. "उत्तम!" तिने पिशवीला जोराने ठोसा मारला.

"काही वाईट नाही," भाऊ म्हणाला.



"दुसऱ्या पिशवीत काय आहे?" बहिणीने विचारले.

"बॉक्सिंगचे मोजे," भाऊ म्हणाला. "आणि हे पुस्तक, *स्वसंरक्षणाची कला.*"

"हे सगळं कुठे मिळालं तुला?" बहिणीने विचारले.

"मिस्टर ग्रिझमेयरनी दिलं. मी त्यांना सांगितलं की माझ्या एका मित्राला एक गुंड त्रास देतोय. हे फक्त आठवडाभरासाठी मिळालंय आपल्याला. सोमवारी सकाळी मी हे परत करेन त्यांना."

"मग वाट कशाला बघायची?" बहीण म्हणाली. "**चल सुरू करू ठोकायला.**"



बहीण स्वसंरक्षणाची कला खूप लवकर शिकली. भावाच्या मदतीने तिने....





डाव्या बाजुने ठोसा कसा द्यायचा,

उजव्या बाजुने ठोसा कसा द्यायचा,



डाव्या बाजुने पकड कशी घ्यायची,

हनुवटीखालून ठोसा कसा द्यायचा,





इतरांचे वार कसे चुकवायचे, ही तंत्रे शिकून घेतली.



तिने ठोसे मारून मारून शेंगांच्या पिशवीचे हाल हाल करून टाकले.

"तू खूप काही शिकलीस आठवडाभरात," भाऊ सोमवारी सकाळी बहिणीला म्हणाला. "पण एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेव. *टफ्फीपासून लांब राहायचं.* ती लहानसहान गोष्टींचा बाऊ करते. ती तर माझ्याशीसुद्धा मारामारी करायला निघाली होती!"

"काळजी करू नकोस," बहीण म्हणाली. "तिने माझ्या जबड्यावर मारलेला ठोसा अजून जाणवतोय मला."



बहीण टफ्फीला टळू लागली. सोमवारी संपूर्ण दिवस ती टफ्फीपासून लांब राहिली.





आणि मंगळवारीसुद्धा. पण बुधवारी मधल्या सुट्टीत टफ्फी अत्यंत वाईट आणि खोडसाळ वागली. बहिणीला काहीतरी करणे भागच होते. *टफ्फी एका पक्ष्याच्या पिल्लाला, जो अजून उडूही शकत नव्हता, दगड मारत होती.* "असं करू नकोस! गुंड मुली!" बहीण ओरडली. "तू त्या पिल्लांना इजा पोहोचवतेयस!"





"अरे, ही तीच गुलाबी बो आहे ना!" टफ्फी म्हणाली. "पिल्लांना नाही मारायचं! ठीक, तर तुला मारते!"

ठोसा मारण्यासाठी मूठ आवळून टफ्फी बहिणीकडे धावली.

पण बहिणही सज्ज होती. आपला जबडा वाचवण्यासाठी तिने डावा हात समोर धरला आणि उजवा हात वर केला. टफ्फीने आपल्या उजव्या हाताने ठोसा मारला तेव्हा बहिणीने स्वत:चा बचाव केला आणि मग उजव्या हाताने तिच्या नाकावर जोरदार ठोसा लगावला.

एक क्षण टफ्फी सुन्न झाली आणि मटकन खाली बसली. तिच्या नाकातून भळाभळा रक्त वाहू लागले.



त्याच वेळी मधल्या सुट्टीच्या एका शिक्षिकेने बहिणीवर आणि टफ्फीवर झडप घातली. दोघांना धरून ती शाळेच्या आत घेऊन गेली आणि त्यांना प्रिन्सिपलच्या खोलीबाहेर ठेवलेल्या बाकावर बसवले.



आपण पिल्लाचे रक्षण केले, याचा बहिणीला एकीकडे अभिमान वाटत होता तर प्रिन्सिपलला भेटायचे म्हणून ती चिंतितही होती. पण टफ्फीला रडताना पाहून ती खूप आश्चर्यचकीत झाली. “रडतेस का? मी तर फक्त एकच ठोसा दिला तुला,” बहीण म्हणाली.

MR HONEYCOMB
PRINCIPAL
प्रिन्सिपल

“त्यासाठी नाही रडत आहे मी,” टफ्फी म्हणाली.

“मग कशाला रडतेयस?” बहिणीने विचारले. तिला कळत नव्हते की टफ्फीसारखी उपद्रवी आणि दुष्ट मुलगी कोणत्या कारणासाठी रडत होती.

"प्रिन्सिपलनी माझ्या घरी सांगितलं तर!" टफ्फी बोलली, "मला फार वेळ कुठेच राहू देणार नाहीत मग घरचे लोक."

हं, बहीण विचार करू लागली. हिला बहुधा घरात खूप मार पडत असावा. म्हणूनच शाळेत इतर मुलांना मारायला आवडतं हिला. पण तिने याबद्दल जास्त विचार केला नाही.





तिला या गोष्टीची काळजी वाटत होती की तिचे काय होणार. शाळेचे प्रिन्सिपल, श्रीयुत *हनीकोंब*, मारामारीच्या घटनांबाबत खूप कठोर निर्णय घेत.

सुदैवाने, एका शिक्षकांनी ही मारामारीची घटना बघितली होती. त्यांनी श्रीयुत हनीकोंब यांना सांगितले की बहीण एका पक्ष्याच्या पिल्लाला वाचवायचा प्रयत्न करत होती. त्यामुळे प्रिन्सिपलनी बहिणीला फक्त ताकीद देऊन सोडून दिले.



आणि टफ्फीचे काय झाले! प्रिन्सिपलनी तिच्या आईवडिलांना काही कळवले नाही. पण त्यांनी एका आठवड्यासाठी टफ्फीची मधली सुट्टी बंद केली. पुढे बराच काळ तिला आठवड्यातून दोन वेळा शाळेच्या मानसोपचारतज्ज्ञाला भेटावे लागत असे.

समाप्त